महाराष्ट्र सुजल निर्मल अभियानांतर्गत
सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या
कास धरणाची उंची वाढविण्याच्या योजनेस
सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०२०/प्र.क्र.६१/पापु.२२**
९ वा मजला, नविन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ नोव्हेंबर, २०२०

वाचा :

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-१०००/प्र.क्र.४१०/पापु-२२, दि.१५.०७.२०००
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२, दि.२२.१०.२००८
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२००९/प्र.क्र.७८/पापु-२२, दि.२५.०८.२००९
५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. मजिप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दि. १८.०२.२०११
६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०११/प्र.क्र.२९/पापु-२२,दि.०३.०३.२०११
७) सहायक मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, यांचे पत्र क्र. सीई (एसपी)/डीई-२/पीबी-५/कास/७०५९/२०११ दि.०८.०९.२०११
८) मुख्याधिकारी, सातारा नगरपरिषद यांचे जा.क्र.सानप/९७४, दि. ०७.०२.२०१८ चे पत्र
९) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१४/प्र.क्र.२/पापु-२२, दि.०६.०६.२०१९
१०) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.२/पापु-२२, दि. ११.०९.२०१९
११) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. पुनर्वि-२०२०/प्र.क्र.१८/पापु-०४, दि. १४.०२.२०२०
१२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.०२/पापु-२२, दि. १७.०२.२०२०
१३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे क्र. सुनिअ-२०२०/प्र.क्र.६१/पापु-२२, दि. २४.०८.२०२० चे पत्र.
१४) मुख्याधिकारी, सातारा नगर परिषद यांचे जा.क्र.सानप/साबां./२९९, दि.२४.०८.२०२० चे पत्र
१५) वित्त विभागाचे क्र. व्यअस-२०२०/प्र.क्र.३०/अर्थ-२, दिनांक ६.११.२०२० चे पत्र

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल योजनाअंतर्गत संदर्भ क्रमांक ६ अन्वये सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे योजनेस रु.४२,८९,००,०००/- इतक्या रक्कमेच्या ढोबळ किंमतीच्या भांडवली कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सहायक मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे यांनी संदर्भ क्रमांक ७ अन्वये सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे योजनेच्या एकूण रु.३६,४३,१५,३५१/- इतक्या ढोबळ किंमतीच्या भांडवली कामाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिली आहे. त्यानुसार सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविण्याबाबतच्या भांडवली कामाची तांत्रिक मान्यतेची किंमत रु. ३६,४३,१५,३५१/- एवढी गृहीत धरुन सदर योजनेस रु.२९,१४,५२,२८१/- इतके शासन अनुज्ञेय अनुदान ( ८०% ) असून सातारा नगरपरिषदेच्या सहभागाची रक्कम रु. ७,२८,६३,०७०/- ( २०%) इतकी आहे.

सातारा नगर परिषदेने सदर योजनेच्या सहभागाची संपूर्ण रक्कम संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली असून संदर्भ क्रमांक ५,९, १० व १२ अन्वये एकूण रु. २९,१४,००,१२३/- इतके शासन अनुज्ञेय अनुदान सातारा नगरपरिषदेस वितरीत करण्यात आलेले आहे. कास धरण हे सातारा नगरपरिषदेच्या मालकीचे असून जलसंपदा विभागामार्फत सदर योजनेचे काम सुरु आहे. सदरहू योजनेचे ८०% काम पूर्ण झालेले आहे. योजनेच्या कामावर रु. ३७,८१,१७,१२३/- इतका खर्च झालेला आहे.

तथापी, मुख्याधिकारी,सातारा नगरपरिषद यांनी संदर्भाधीन क्रमांक १३ अन्वये कास धरणाची उंची वाढविण्याच्या प्रकल्पास शासनाने मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाचे काम सुरु करण्यापुर्वी कास धरणाची भिंत व अतिरिक्त बुडीत क्षेत्र यासाठी आवश्यक असण्या-या जमीनीची मोजणी करुन खाजगी जमीन, वन जमीन व मुलकोपड जमीन संपादन करणे, DWELLERS ACT २००६ अन्वये कास ग्राम सभेचा ठराव घेणे व त्यानंतर जिल्हाधिकारी, सातारा यांचेकडून प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे, सदर प्रकल्प पर्यावरण संवेदनशील क्षेत्रामध्ये असल्याने, प्रकल्पास केंद्र व राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची अनुमती घेणे, धरण बांधकामासाठी आवश्यक असणा-या २.६७ हेक्टर वन जमीनीच्या बदल्यात पर्यायी वनेत्तर जमीन शासनाकडून संपादन करुन वन विभागास हस्तांतरण करणे, सदरचा प्रकल्प हा कास पठार या नैसर्गिक जागतिक वारसा स्थळाजवळ असल्याने भारतीय पुरातत्व विभागाचा ना-हरकत दाखला घेणे व वन जमीनीवरील वृक्षतोडीस राष्ट्रीय हरीत लवाद यांची मान्यता घेणे, पाणी उपलब्ध प्रमाणपत्र घेणे, धरण बांधकामामुळे सातारा कास बामणोली रस्ता बुडीत क्षेत्रामध्ये जात असल्याने त्यास पर्यायी रस्ता करणे इ. मान्यता घेण्यासाठी लागलेला कालावधी यामुळे झालेली अतिरिक्त भाववाढ, निविदा जादा दराने स्वीकत करणे, धरणाच्या उपांगामध्ये झालेली वाढ इ. कारणामुळे प्रकल्पाच्या किंमतीमध्ये वाढ झाल्यामुळे रु.९५,७५,५९,३००/- इतक्या किंमतीचा सुधारित प्रकल्प अहवाल (डिपीआर) शासनास सादर केला आहे. मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे यांनी सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे या योजनेच्या रु.९५,७५,५९,३००/- इतक्या किंमतीस दिनांक २१ ऑगस्ट, २०२० च्या पत्रान्वये सुधारीत तांत्रिक मंजूरी प्रदान केली आहे. सुधारीत प्रकल्प अहवालामुळे सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे योजनेच्या भांडवली कामाच्या उपांगाच्या खर्चामध्ये वाढ होणार असल्याने सदर बाबी विचारात घेवून शासन निर्णय दिनांक ०३ मार्च, २०११ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या सातारा शहरास पाणी

पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे योजनेच्या भांडवली कामांच्या सुधारीत प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सुजल अभियानअंतर्गत, शासन निर्णय, दिनांक ३ मार्च, २०११ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे योजनेच्या एकुण रुपये ९५,७२,००,०००/- (अक्षरी रुपये पंच्यान्नव कोटी बाहत्तर लाख फक्त) इतक्या किमतीच्या भांडवली कामांच्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे योजनेसाठी उपांगनिहाय मंजूर व सुधारित किंमतीचे विवरण खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | योजनेतील मंजूर उपांगे | शासन निर्णय दिनांक ३ मार्च, २०११ नुसार मंजूर किंमत | सुधारीत किंमत |
|---|---|---|---|
| १. | सर्वेक्षण | रु. ३६,६८,०००/- | रु. १,९८,८९,२००/- |
| २. | कास धरणाची उंची वाढविणेचे मुख्य काम, सांडव्याचे काम, कॅनाल इ. कामे | रु.३३,८२,२९,३६२/- | रु. ७७,८९,०६,०००/- |
| ३. | हेड रेग्युलेटर | रु.६,६५,३०,९८६/- | रु. ११,३१,६६,०००/- |
| | **एकूण खर्च** | **रु. ४०,८४,८८,३४८/-** | **रु. ९१,१९,६१,२००/-** |
| | **आस्थापना खर्च ५%** | **रु. २,०४,११,६५२/-** | **रु. ४,५२,३८,८००/-** |
| | **एकूण ढोबळ** | **रु. ४२,८९,००,०००/-** | **रु. ९५,७२,००,०००/-** |

२. सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे या भांडवली योजनेच्या कामास रु.४२,८९,००,०००/- इतक्या किंमतीची शासन निर्णय, दिनांक ३ मार्च, २०११ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच सदर भांडवली कामाची सुधारित किंमत रु.९५,७२,००,०००/- इतकी येत असून शासन निर्णय, दिनांक ३ मार्च, २०११ अन्वये भांडवली कामास देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेमध्ये १२३.१७ टक्क्यांनी वाढ झालेली आहे.

३. सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या संदर्भात दिनांक १९ ऑक्टोबर, २०२० रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये सातारा शहर व लगतच्या १५ गावांना पिण्याचे पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे या कामास रु.९५,७२,००,०००/- इतक्या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आलेली आहे.

४. महाराष्ट्र सुजल निर्मल अभियांनातर्गत सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे योजनेतील मंजूर सुधारित भांडवली कामास शासन निर्णय दिनांक ३ मार्च, २०११ मध्ये नमुद केलेल्या अटीच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र सुजल निर्मल अभियांनातर्गत सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविण्याच्या प्रकल्पाच्या अनुषंगाने मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे अध्यक्षतेखाली दिनांक

१९.०८.२०२० रोजी मा. उप मुख्यमंत्री महोदयाचे दालन, ६ वा मजला, मंत्रालय, मुंबई येथे संपन्न झालेल्या बैठकीत मा. उप मुख्यमंत्री महोदय यांनी दिलेल्या निर्देशानुसार सातारा शहरास पाणी पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविणे योजनेच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेनुसार उर्वरित निधी सातारा नगरपरिषदेस नगर विकास विभागाने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/ प्र.क.३० / विनियम भाग-२ या शासन निर्णयातील वित्तीय अधिकार नियम पुस्तीका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-तीन, अनु.क्र. ६ (सहा), परिच्छेद २७ (अ) नुसार विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६०/१४४३, दिनांक ३०/०९/२०२० वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२२, दिनांक ८/१०/२०२० वर दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२०११२४११५७५५३८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: c=IN, o=Government of maharashtra, ou=Water supply & Sanitation, postalCode=400032, st=Manipur, 2.5.4.20=2a611aa6775332ae4fb220e8dd3ec11f80d6b95fec14b729156665cff860b06b, cn=Mahendra Babusing Hajari
Date: 2020.11.24 12:57:25 +05'30'

(म.बा. हजारी)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

- मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई

- अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
- अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
- अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
- प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
- महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी.जी.ओ. इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षि कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०.
- महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हील लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर-४४० ००१.
- विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
- महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (५ प्रतीसह)
- आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, सर पोचखानवाला रोड, वरळी, मुंबई-३०.
- जिल्हाधिकारी, सातारा.
- नियंत्रक अधिकारी तथा सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
- आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४.
- मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे.
- सहाय्यक मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), जलसंपदा विभाग, पुणे.
- कार्यकारी अभियंता, उरमोडी धरण विभाग, सिंचन भवन, कृष्णनगर, सातारा.
- जिल्हा प्रकल्प अधिकारी (नगरपालिका), जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा.
- जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
- मुख्याधिकारी, सातारा नगरपरिषद, जि.सातारा.
- उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवीमुंबई- ४०० ६१४.
- वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- कक्ष अधिकारी / लेखा अधिकारी, पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती, पापु-२२